**सहाय्यक वनसंरक्षक (गट-अ) तसेच वनक्षेत्रपाल (गट-ब) पदांच्या संदर्भात मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी दिलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करण्यासाठी अनुसरावयाची कार्यपध्दती.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- एमएफएस-२०१८/प्र.क्र.४५/फ-८**

मादाम कामा मार्ग, हूतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

दिनांक :- १४ ऑगस्ट, २०१८

<u>वाचा :-</u> १) शासन अधिसूचना महसूल व वन विभाग क्र. एमएफएस-१०८७/७५/प्र.क्र.२३/फ-८, दि.१२ मार्च १९९८.

२) शासन अधिसूचना महसूल व वन विभाग क्र. एफटीआर-१२९०/प्र.क्र.३०२/फ-४, दि. ६ एप्रिल १९९८

३) शासन अधिसूचना महसूल व वनविभाग क्रमांक एफएसटी-०३/१४/प्र.क्र.२२१/फ-४, दिनांक ५ फेब्रुवारी, २०१५

४) अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (प्रशासन दुय्यम संवर्ग) नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१०(१) / आस्था/एक/प्र.क्र.२६१(१५-१६)/६३, दि. १८/०५/२०१८.

<u>प्रस्तावना :-</u>

वन विभागांतर्गत सहाय्यक वनसंरक्षक पदाचे सेवाप्रवेश नियम दिनांक १२ मार्च १९९८ च्या अधिसूचनेन्वये प्रसिध्द करण्यात आलेले आहेत. तसेच वनक्षेत्रपाल पदाचे सेवाप्रवेश नियम दिनांक ६ एप्रिल १९९८ च्या अधिसूचनेन्वये प्रसिध्द करण्यात आले होते,परंतू वनक्षेत्रपालाचे सेवाप्रवेश नियम अधिक्रमित करुन दिनांक ५ फेब्रुवारी, २०१५ चे अधिसूचनेन्वये नवीन सेवाप्रवेश नियम प्रसिध्द करण्यात आलेले आहेत. सहाय्यक वनसंरक्षक व वनक्षेत्रपाल ही पदे राज्यस्तरीय आहेत.

२. वाचा अ.क्र.१ व २ येथील अधिसूचनेन्वये प्रसिध्द केलेल्या सेवाप्रवेश नियमानुसार सहाय्यक वनसंरक्षक व वनक्षेत्रपाल यांना ३ वर्षाचा परिविक्षाधीन कालावधी ठरवून दिलेला आहे. त्यामध्ये केंद्र शासनाने मान्यता दिलेल्या प्रशिक्षण संस्थेतील प्रशिक्षणाचा व सदर प्रशिक्षण यशस्वीरित्या पूर्ण झाल्यानंतर वनविभागांतर्गत पूर्ण करावयाच्या क्षेत्रीय प्रशिक्षणाचा समावेश आहे. सरळसेवेने निवड झालेल्या सहाय्यक वनसंरक्षक व वनक्षेत्रपालांना प्रशिक्षण संस्थेतील प्रशिक्षणादरम्यान विद्यावेतन (Stipend) मंजूर करण्यात येते. तसेच केंद्र शासनाने मान्यता दिलेल्या प्रशिक्षण संस्थेतील प्रशिक्षण पूर्ण केल्यानंतर क्षेत्रीय प्रशिक्षणासाठी जेव्हा संबंधीत अधिकारी वनविभागात रुजू होतात, त्या दिवशीपासून त्यांना जेष्ठता, वेतन व इतर सेवाविषयक लाभ अनुज्ञेय करण्यात येतात.

३. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून सरळसेवेने नियुक्त झालेल्या सहाय्यक वनसंरक्षक तसेच वनक्षेत्रपाल यांचा केंद्र शासनाने मान्यता दिलेल्या प्रशिक्षण संस्थेतील प्रशिक्षण कालावधी हा कर्तव्य कालावधी म्हणून विचारात घेण्याबाबत तसेच या कालावधीत देण्यात येणाऱ्या विद्यावेतनाऐवजी (Stipend) या पदाच्या वेतनश्रेणीनुसार नियमित वेतन देण्याबाबत श्री. अशोक राम पऱ्हाड, सहायक वनसंरक्षक व इतर तसेच श्री. अजित महाविर साजणे, वनक्षेत्रपाल व इतर यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे अनुक्रमे मूळ अर्ज क्र. ५७६/२०१५ व मुळ अर्ज क्र. ५४/२०१५ दाखल केले होते. याच मुद्दांवर श्री. प्रदिप बुधनवार, वनक्षेत्रपाल व इतर यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मुळ अर्ज क्रमांक १९५/२०१६ दाखल केला होता. मुळ अर्ज क्र. ५७६/२०१५ मध्ये मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी दि. ०३/०२/२०१६ रोजी अर्जदाराचे बाजूने निर्णय दिल्यानंतर राज्य शासनाच्यावतीने पुनर्विलोकन अर्ज क्रमांक ६/२०१६ दाखल करण्यात आला होता. सदर पुनर्विलोकन अर्ज क्र. ६/२०१६ व मुळ अर्ज क्रमांक ५४/२०१५ यामध्ये मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी दि. १६/०९/२०१६ रोजी एकत्रित निर्णय दिला आहे. त्यानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून सरळसेवेने नियुक्त झालेल्या सहाय्यक वनसंरक्षक व वनक्षेत्रपाल यांचा केंद्र शासनाने मान्यता दिलेल्या प्रशिक्षण संस्थेतील प्रशिक्षण कालावधी हा कर्तव्य कालावधी म्हणून गृहीत धरणे व तद्अनुषंगिक सर्व लाभ मंजूर करण्याबाबत तसेच या कालावधीत देण्यात येणाऱ्या विद्यावेतनाऐवजी (Stipend) या पदाच्या वेतनश्रेणीनुसार नियमित वेतन मंजूर करण्याबाबत मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी निर्णय दिलेला आहे. याचप्रकारचा निर्णय मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी मुळ अर्ज क्र.१९५/२०१६ मध्ये दिनांक १२/०७/२०१७ रोजी दिलेला आहे.

४. मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांच्या दिनांक १६/०९/२०१६ आदेशाबाबत विधी व न्याय विभागाच्या अभिप्रायास अनुलक्षून प्रस्तुत प्रकरणी मा. उच्च न्यायालयात अपिल दाखल न करण्याचा निर्णय विभागाने घेतला आहे. तद्नुसार मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या निर्णयाची अंमलबजावणी करण्यासाठी अनुसरावयाची कार्यपध्दती विहीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वाचा अ.क्र.१ व २ येथील अधिसूचनेन्वये, सहाय्यक वनसंरक्षक व वनक्षेत्रपाल या पदांसाठी विहीत केलेल्या सेवाप्रवेश नियमास अनुलक्षून खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

(१) वाचा अ.क्र.१ व २ येथील अधिसूचनेन्वये प्रसिध्द केलेल्या सेवाप्रवेश नियमानुसार सरळसेवेने नियुक्त अधिकाऱ्यांनी केंद्र शासनाने मान्यता दिलेल्या प्रशिक्षण संस्थेतील प्रशिक्षण यशस्वीरित्या पूर्ण केल्यानंतर, त्यांचा प्रशिक्षण कालावधी हा कर्तव्य कालावधी म्हणून गृहीत धरुन त्यांचे प्रशिक्षण सुरु झाल्याच्या दिनांकापासून नियमित अर्हताकारी सेवा निश्चित करुन त्यांना सर्व प्रयोजनार्थ सेवा विषयक लाभ देण्यात यावेत.

(२) सहाय्यक वनसंरक्षक व वनक्षेत्रपाल यांचेबाबतीत तीन वर्षाचे परिवीक्षाधीन कालावधीमध्ये अनुक्रमे दोन व दीड वर्षाचे केंद्र शासनाने मान्यता दिलेल्या प्रशिक्षण संस्थेतील प्रशिक्षणाचा व अनुक्रमे एक व दीड

वर्षाचे वन विभागांतर्गत क्षेत्रीय प्रशिक्षणाचा समावेश होतो. त्यापैकी केंद्र शासनाने मान्यता दिलेल्या प्रशिक्षण संस्थेतील प्रशिक्षण यशस्वीरित्या पूर्ण केल्यानंतर, सदर प्रशिक्षण संस्थेत प्रशिक्षणासाठी रुजू झाल्याच्या दिनांकापासून अशा अधिकाऱ्यांची सुधारीत वेतननिश्चिती करुन त्यांना अदा करण्यात आलेले विद्यावेतन (Stipend) व सुधारीत वेतननिश्चितीनुसार अदा करावयाचे वेतन यातील फरकाची रक्कम अदा करण्यात यावी.

(३) सरळ सेवेने नियुक्त सहाय्यक वनसंरक्षक व वनक्षेत्रपाल यांच्याबाबतीत, केंद्र शासनाने मान्यता दिलेल्या प्रशिक्षण संस्थेत अथवा विविध प्रशिक्षण संस्थेत एकाच दिनांकाला प्रशिक्षण सुरु झाल्यास प्रशिक्षणाला गेलेल्या अधिकाऱ्यांची परस्पर जेष्ठता आयोगाने घेतलेल्या परिक्षेत उमेदवाराने मिळविलेले गुण व केंद्र शासनाने मान्यता दिलेल्या प्रशिक्षण संस्थेतील प्रशिक्षण पाठ्यक्रमाच्या शेवटी घेण्यात येणाऱ्या अंतिम परिक्षेत उमेदवाराने मिळविलेले गुण एकत्रीत करुन त्यांची प्रशिक्षण संस्थेतील प्रशिक्षण सुरु झाल्याचे दिनांकापासून निश्चित करावी .

(४) प्रस्तुत शासन निर्णयानुसार सरळसेवेने प्रविष्ठ सहाय्यक वनसंरक्षक व वनक्षेत्रपाल या संवर्गातील अधिकाऱ्यांची सेवाजेष्ठता अनुक्रमे किमान दोन व दीड वर्ष अगोदर निश्चित होणार असल्याने केवळ जेष्ठतेनुसार सेवाकालावधी पूर्ण होत असल्याच्या कारणास्तव त्यांची वरच्या पदावरील पदोन्नतीची मागणी विचारात घेण्यात येवू नये. या करिता इतर पात्रता निकष, भाषा परिक्षा व विभागीय परिक्षा उत्तीर्ण होणे इ. बाबी देखील विचारात घेण्यात याव्यात.

(५) सरळसेवेने नियुक्त सहाय्यक वनसंरक्षक व वनक्षेत्रपाल यांची आश्वासित प्रगती योजनेसाठी बारा वर्षाची गणना करताना त्यांची सेवा केंद्र शासनाने मान्यता दिलेल्या प्रशिक्षण संस्थेतील प्रशिक्षण सूरू झालेल्या दिनांकापासून ग्राह्य धरावी.

(६) सरळ सेवेने नियुक्त सहाय्यक वनसंरक्षक व वनक्षेत्रपाल हे सन २००५ नंतर सेवेत आले असल्याने त्यांना परिभाषित अंशदायी निवृत्तीवेतन योजना लागू होईल. मात्र प्रकरण परत्वे अधिकाऱ्यास २००५ पूर्वीचा नियमित सेवा दिनांक मंजूर केल्यास ते सेवा निवृत्तीवेतन घेण्यास पात्र राहतील.

(७) सरळ सेवेने नियुक्त सहाय्यक वनसंरक्षक व वनक्षेत्रपाल यांना केंद्र शासनाने मान्यता दिलेल्या प्रशिक्षण संस्थेतील प्रशिक्षण सुरु झाल्याच्या दिनांकापासून केवळ तीन वर्षे कालावधी विचारात न घेता स्थायित्व प्रमाणपत्रासाठी आवश्यक असलेले निकष व परिवीक्षाधीन कालावधी यशस्वीरीत्या समाप्त झाल्याचे प्रमाणपत्र इ. बाबी पूर्ण करत असल्यास त्यांना स्थायीत्व प्रमाणपत्र प्रदान करण्यात यावे.

(८) सरळ सेवेने नियुक्त सहाय्यक वनसंरक्षक व वनक्षेत्रपाल यांच्या बाबतीत मराठी व हिन्दी भाषा परिक्षा नियुक्तीच्या दिनांकापासून दोन वर्षात उत्तीर्ण होणे/सुट प्राप्त करणे आवश्यक आहे. यामध्ये सुधारणा करुन आता हा कालावधी प्रशिक्षण सुरु होण्याच्या दिनांकापासून चार वर्ष धरण्यात यावा.

(९) सरळ सेवेने नियुक्त सहाय्यक वनसंरक्षक व वनक्षेत्रपाल यांना शासनाने वेळोवेळी अनुज्ञेय केलेले लाभ / सवलती अदा करताना शासनाने निर्गमीत केलेले शासन निर्णय / परिपत्रक / आदेश इत्यादीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

उपरोक्त शासन निर्णय हा सामान्य प्रशासन विभागाकडील अनौपचारीक संदर्भ क्र. अमुस (सेवा) / साप्रवि क्र.७ दि. २६ जुलै, २०१८ अन्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ३३९/२०१८/सेवा-३ दि.४/८/२०१८ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१८०८१४१७०८१४६७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d366233b80405514f23a879132aeec, serialNumber=f0d5ee4c99cc9cbfa8761b3ddc7bd6650bad33302f33a35400ad5aad2291371a, cn=Atul Ashok Kode
Date: 2018.08.14 17:49:40 +05'30'

**( अतुल कोदे )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.
३. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
५. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग.
७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग.
८. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, महाराट्र राज्य, पुणे.
१०. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
११. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), महाराष्ट्र राज्य,नागपूर
१३. मुख्य वनसंरक्षक/ वनसंरक्षक (सर्व)
१४. उपवनसंरक्षक(सर्व)
१५. विभागीय वन अधिकारी (सर्व)
१६. स्वतंत्र उप वन विभागाचे उपविभागीय वन अधिकारी (सर्व)
१७. वन विभागातील सर्व कार्यासने.
१८. निवडनस्ती फ-४ कार्यासन
१९. निवडनस्ती फ-८ कार्यासन.